**वर्सोवा-बांद्रे (राजीव गांधी) सागरी मार्गाच्या आखणीस मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः व्हीबीएस-२०११/प्र.क्र.१३०/रस्ते-६
दिनांक :- २९.१२.२०११

**वाचा :-** शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.पमुप-२००९/प्र.क्र.१२१/रस्ते-६, दिनांक-१९.१२.२००९.

**प्रस्तावनाः-**

मुंबईच्या पश्चिम उपनगरीय क्षेत्रात अंधेरी, गोरेगांव, बोरिवली या भागात मागील काही वर्षात लोकसंख्येत मोठया प्रमाणात वाढ झाल्याने, पर्यायाने या भागातील वाहतुकीतही प्रचंड प्रमाणात वाढ झालेली आहे. सध्याचे एस.व्ही.रोड, पश्चित द्रुतगती महामार्ग हे देखील वाहतुकीसाठी कमी पडत आहेत. त्यामुळे दक्षिण मुंबईकडे जाणारी ५० टक्के वाहतुक ही वांद्रेच्या पलिकडील भागातील म्हणजे अंधेरी, गोरेगांव, बोरीवली या परिसरातून येत असल्याने पश्चिम मुक्त मार्ग हा बांद्रेच्या पुढे वर्सोवापर्यत वाढविल्यास उपरोक्त पश्चिम उपनगरातील वाहतुक सुलभ व जलद होईल.

वरील बाब विचारात घेऊन शासन निर्णय दि. १९.१२.२००९ अन्वये "बांधा-वापरा-हस्तांतर करा" या तत्त्वावर वर्सोवा-बांद्रे सागरी मार्ग बांधण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर प्रकल्पाकरिता शासनाने महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास "नोडल एजन्सी" घोषित केले असून या प्रकल्पाची आर्थिक व तांत्रिक सुसाध्यता तपासून प्रकल्प कार्यान्वित होण्याच्या दृष्टीने पुढील कार्यवाही करण्यास महामंडळास निदेश देण्यात आले.

या प्रकल्पाचा सविस्तर सुसाध्यता अहवाल तयार करणे व खाजगीकरणांतर्गत सदर सागरी मार्ग बांधण्यासाठीची निविदापूर्व कामे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने नेमलेले सल्लागार- मे. पारसन्स बिन्करहॉफ (इं.) प्रा. लि. व कन्सॉर्टियम यांचेमार्फत प्रगतीपथावर आहेत.

**वांद्रे-वर्सोवा सागरी मार्गाच्या पर्यायी आखण्या-** सल्लागाराने सदर सागरी मार्गासाठी खालील पाच पर्यायी आखण्यांचा अभ्यास केला आहे.

| पर्याय क्रमांक | आखणी/मार्ग | |
|---|---|---|
| १ | आखणी क्र. १अ- किनारी मार्ग | संपूर्ण लांबी समुद्र किनारपट्टीलगत (on Reclamation ) असलेला मार्ग (जुहू बीच लगतच्या सुमारे ३ कि.मी.च्या भागात कट अँड कव्हर पध्दतीचे बांधकाम) |
| २ | आखणी क्र. १ब- किनारी मार्ग | संपूर्ण लांबी समुद्र किनारपट्टीलगत (on Stilt ) असलेला मार्ग (जुहू बीच लगतच्या सुमारे ३ कि.मी.च्या भागात कट अँड कव्हर पध्दतीचे बांधकाम) |
| ३ | आखणी क्र. २- किनारी पुल | काही लांबी समुद्रातुन (किनारपट्टीपासून सुमारे २००-३०० मी.) व काही लांबी किनारपट्टीलगत असलेला मार्ग (जुहू बीच लगतच्या सुमारे ३ कि.मी.च्या भागात कट अँड कव्हर पध्दतीचे बांधकाम ) |

| | | |
|---|---|---|
| ४ | आखणी क्र.३-सागरी पुल | संपूर्ण लांबी समुद्रातून (किनारपट्टीपासून सुमारे ९०० मी. अंतरावर) असलेला मार्ग |
| ५ | आखणी क्र.४-सागरी पुल | काही लांबी समुद्र किनारपट्टीलगत (on Reclamation) व उर्वरीत लांबी समुद्रातून (किनारपट्टीपासून सुमारे ९०० मी.अंतरावर ) असलेला मार्ग. |

प्रत्येक पर्यायी आखणीप्रमाणे बांधकामाची ढोबळ अंदाजित किंमत व त्या मार्गाचे पर्यावरणाच्या दृष्टीने होणारे परिणाम व किनारी नियंत्रण क्षेत्र अधिसूचना-२०११ विचारात घेऊन सल्लागार संस्थेने पर्याय क्रमांक-४ येथील आखणी क्र.३ सागरी पूल-संपूर्ण लांबी समुद्रातून (किनारपट्टीपासून समारे ९०० मी. अंतरावर) असलेल्या सागरीमार्गाची शिफारस केली असून महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या संचालक मंडळानेही त्यास मान्यता दिली आहे.

या सर्व बाबींचा विचार करता, वर्सोवा-बांद्रे (राजीव गांधी) या सागरी मार्गाच्या आखणी क्र.३-सागरी पूल-पूर्ण लांबी समुद्रातून (किनारपट्टीपासून सुमारे ९०० मी.अंतरावर) असलेला मार्ग या आखणीस मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१) वर्सोवा-बांद्रे (राजीव गांधी) सागरी मार्ग प्रकल्पासाठी, सल्लागार संस्थेने शिफारस केलेल्या व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने मान्यता दिलेल्या सदर सागरी मार्गाच्या आखणी क्र.३-सागरी पूल-पूर्ण लांबी समुद्रातून (किनारपट्टीपासून सुमारे ९०० मी. अंतरावर) असलेला मार्ग या आखणीस मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर सागरी मार्ग सध्याच्या वांद्रे-वरळी सागरी सेतु, वांद्रे ते नाना नानी पार्क (सातबंगला उद्यानाजवळ) ते वर्सोवा असा राहील व त्यास कार्टर रोड जंक्शन (ओटर्स क्लबजवळ) आणि जुहू कोळीवाडा या दोन ठिकाणी मुख्य सागरी मार्गास जोडणारे रस्ते (Intermediate Connectors) राहतील.

३) प्रकल्पाचे काम हाती घेणेबाबत पुढील कार्यवाही महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने त्वरीत हाती घ्यावी.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने, त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९३/१४६१, दिनांक २६.०९.२०११ तसेच वित्त विभागाच्या सहमतीने, त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २१४/व्यय-११, दिनांक ०४.१०.२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या http://www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली असुन त्याचा संकेतांक क्रमांक २०१११२२९०६१६३११२३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा.शि.लोकरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत :-

मा.राज्यपालांचे खाजगी सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (पाटबंधारे) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम(सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (विशेष प्रकल्प), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपीयन्सी रोड, प्रियदर्शनी पार्क, मुंबई.
सचिव (रस्ते)/(बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपीयन्सी रोड, प्रियदर्शनी पार्क, मुंबई.
मुख्य अभियंता व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
महालेखापाल-१, लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-२, लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
नियोजन विभाग(का.१४१३)
वित्त विभाग, कार्यासन(व्यय-११), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, रस्ते-६, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती.